**कुंडलवाडी विविध कार्यकारी सहकारी संस्था मर्या., कुंडलवाडी, ता. बिलोली, जि. नांदेड व श्रीरामकृष्ण गोदावरी सहकारी उपसा जलसिंचन संस्था मर्या., ता. वैजापूर, जि. छत्रपती संभाजी नगर या संस्थांचे थकित कर्ज (मुद्दल) रक्कम माफ करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :-सीएसएल-१५२३/ प्र.क्र. ३६६/७-स**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :-१८ जून, २०२४

**प्रस्तावना:-**

राज्यातील शेतक-यांनी त्यांची शेती सिंचनाखाली आणण्यासाठी सहकारी तत्वावर उपसा सिंचन संस्थांची स्थापना केली आहे. अशा संस्थांच्या उपसा सिंचन प्रकल्पास / योजनेस विविध बँकांनी कर्ज पुरवठा केलेला आहे. यामध्ये प्रामुख्याने जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका, नागरी सहकारी बँका व राष्ट्रीयकृत बँकांचा समावेश आहे. सहकारी तत्वावरील सिंचन योजनांना कर्ज पुरवठा करताना बँकांनी संबंधित संस्थेच्या सभासद शेतकऱ्यांची जमीन कर्जास तारण घेतलेली असून या शेत जमिनींवर संबंधित बँकांच्या कर्जाचा बोजा नोंद करण्यात आलेला आहे. राज्यातील अनियमीत पाऊस, दुष्काळसदृश्य परिस्थिती यामुळे सिंचनाच्या स्त्रोतामध्ये पाण्याची उपलब्धता कमी झाल्यामुळे बऱ्याच उपसा सिंचन संस्था बंद पडल्या आहेत. त्यामुळे राज्यातील काही जिल्हयात उपसा सिंचन योजना सुरु करण्याचा उद्देश साध्य होऊ शकलेला नाही. अशा संस्थांचे कर्जदार शेतकरी केवळ नैसर्गिक प्रतिकूल परिस्थितीमुळे योजना बंद पडल्यामुळे उपसा सिंचन योजनेसाठी बँकेकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड करु शकले नाहीत. उपसा सिंचन संस्थांनी विविध बँकांकडून कर्ज उभारणी करुन योजना पूर्ण केल्या आहेत. मात्र कर्जाची परतफेड झालेली नसल्याने संबंधीत बँकांनी कर्ज परतफेडीसाठी संबंधीत शेतकऱ्यांकडे पाठपुरावा सुरु केला आहे. शेतकऱ्यांनी कर्जाचा भरणा केला नसल्याने त्यांच्या जमिनींवर कर्जाचे बोजे नोंदविण्यात आले आहेत. सदर बोजा नोंदीमुळे संबंधीतांना त्यांच्या जमिनींची विक्री करता येत नाही. तसेच बँका अथवा तत्सम वित्तीय संस्थेकडून शेतीसाठी कर्जदेखील उपलब्ध होऊ शकत नाही. अशा परिस्थितीत कर्जदार शेतकरी दुहेरी संकटात सापडला असून अशा संस्थांना कर्जमाफी देण्याची मागणी विविध लोकप्रतिनिधींनी शासनाकडे सातत्याने केली आहे.

कुंडलवाडी विविध कार्यकारी सहकारी संस्था मर्या., कुंडलवाडी, ता. बिलोली, जि. नांदेड या संस्थेच्या दोन योजना व श्रीरामकृष्ण गोदावरी सहकारी उपसा जलसिंचन संस्था मर्या., ता. वैजापूर, जि. छत्रपती संभाजी नगर या संस्थेच्या चार योजनांचे थकीत कर्ज (मुद्दल) माफ करण्यास व सदर कर्ज (मुद्दल) रक्कम संबंधित बँकांना शासनामार्फत अदा करण्यास मान्यता देण्याबाबत प्रस्ताव शासन स्तरावर विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

१. कुंडलवाडी विविध कार्यकारी सहकारी संस्था मर्या., कुंडलवाडी, ता. बिलोली, जि. नांदेड या संस्थेच्या दोन उपसा जलसिंचन योजनांचे थकीत कर्ज (मुद्दल) रु.२०५.२७ लाख व श्रीरामकृष्ण गोदावरी सहकारी उपसा जलसिंचन संस्था मर्या., ता. वैजापूर, जि. छत्रपती संभाजी नगर या संस्थेच्या चार योजनांचे थकीत कर्ज (मुद्दल) रु. ६४२६.५९ लाख माफ करण्यास व सदर रक्कम संबंधित बँकांना शासनामार्फत अदा करण्यास खालील अटीच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) या कर्जमाफीचा लाभ मिळण्यासाठी नांदेड जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या., नांदेड व औरंगाबाद जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या., छत्रपती संभाजीनगर या बँकांनी सदर कर्जावरील संपूर्ण व्याज माफ करणेबाबत संचालक मंडळ / सर्वसाधारण सभेच्या ठरावासह सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांना प्रस्ताव सादर करणे आवश्यक राहील. बँकेकडून सदरचा प्रस्ताव शासनास प्राप्त झाल्यानंतरच शासकीय अर्थसहाय्य बँकेस वितरीत करण्यात येईल.

२) शासनाकडून सदर रक्कम बँकाना उपलब्ध करून दिल्यानंतर संबंधित संस्थांच्या कर्ज खात्यावर वर्ग करून सभासद शेतकऱ्यांच्या नावावरील कर्ज बेबाक करण्याची तसेच कर्जदार शेतकऱ्यांचा सातबारा कोरा करण्याची कार्यवाही संबंधित बॅकेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील.

**२.** शासन निर्णयातील वरील बाबींचे सनियंत्रण करण्यासाठी सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी क्षेत्रीय अधिकाऱ्यांना अधिक मार्गदर्शक सूचना देण्याची आवश्यकता असल्यास त्याबाबत सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या स्तरावरुन परिपत्रकान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमीत कराव्यात .

**३.** सदर कर्जमाफीच्या निधी वितरणाबाबत स्वतंत्र आदेश निर्गमित करण्यात येईल.

**४.** राज्यातील अन्य सहकारी उपसा जलसिंचन संस्थांकडील थकीत कर्ज (मुद्दल) माफ करण्याबाबत धोरण तयार करण्यास शासनाच्या मान्यतेबाबत स्वतंत्रपणे निर्णय घेण्यात येईल.

**५.** सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २४० दि. ०२.०४.२०२४ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३३८/२०२४ दिनांक १०.०५.२०२४ अन्वये मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६१८१५३७५६५००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAHUL CHANDRASHEKHAR SHINDE

Digitally signed by RAHUL CHANDRASHEKHAR SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=2b92cb6c4f872b298eba5b276742f5d2e72d0421076aa9ed40beedc51e27e130, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6D85E99C3671CB5DA40A5218962B08B2FAEA34CA2F0BFC7731E9E07ECA33F6DA, cn=RAHUL CHANDRASHEKHAR SHINDE
Date: 2024.06.18 15:53:57 +05'30'

**(राहुल शिंदे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२
२. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२
३. मा. उप मुख्यमंत्री (अर्थ) यांचे सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२
४. मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
५. मा. विधानसभा सदस्य / विधान परिषद सदस्य (सर्व)
६. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव.

७. मा. अपर मुख्य सचिव(सहकार व पणन), सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग.
८. मा. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग.
९. मा. प्रधान सचिव (विधी व न्याय), विधी व न्याय विभाग.
१०. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
११. जिल्हाधिकारी (सर्व)
१२. विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
१३. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
१४. सरव्यवस्थापक/ मुख्य कार्यकारी अधिकारी, नांदेड जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या., नांदेड व औरंगाबाद जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या., छत्रपती संभाजीनगर
१५. चेअरमन, कुंडलवाडी विविध कार्यकारी सहकारी संस्था मर्या., कुंडलवाडी, ता. बिलोली, जि. नांदेड
१६. चेअरमन, श्रीरामकृष्ण गोदावरी सहकारी उपसा जलसिंचन संस्था मर्या., ता. वैजापूर, जि. छत्रपती संभाजी नगर
१७. निवड नस्ती.